**मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार न्यायालय विकास आराखडा तयार करणे व वस्तुस्थितीदर्शक अहवाल सादर करणेकरिता मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. समिती-१११८/प्र.क्र.१३५/का.१३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०८ ऑगस्ट, २०१८.

**पहा :-** १) मा.सर्वोच्च न्यायालय, दिल्ली यांनी रिट याचिका (दिवाणी) क्र.१०२२/१९८९ मधील इंटरलोक्युटरी ॲप्लीकेशन क्र.२७९/२०१० मध्ये दिनांक ०२ ऑगस्ट,२०१८ रोजी दिलेले आदेश.

**प्रस्तावना :-**

ऑल इंडिया जजेस असोसिएशन वि. युनियन ऑफ इंडिया, या रिट याचिका (दिवाणी) क्र.१०२२/१९८९ मधील इंटरलोक्युटरी अर्ज क्र.२७९/२०१० मध्ये मा. सर्वोच्च न्यायालयाने सर्व न्यायालयीन संकुलांना मूलभूत व महत्वाच्या सुविधा पुरविण्याबाबत निर्देश दिनांक ०२.०८.२०१८ च्या आदेशान्वये दिले आहेत.

तसेच, मा. सर्वोच्च न्यायालयाने जारी केलेल्या निर्देशांप्रमाणे न्यायालयांचा विकास आराखडा तयार करण्यासाठी आणि वस्तुस्थितीदर्शक अहवाल (Status Report) मा. न्यायालयास सादर करण्यासाठी राज्याचे मुख्य सचिवांना एक समिती गठीत करण्याचे मा. सर्वोच्च न्यायालयाने आदेशित केले आहे. त्या अनुषंगाने मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. सर्वोच्च न्यायालयाच्या दिनांक ०२.०८.२०१८ रोजीच्या आदेशानुसार मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देशांनुसार न्यायालय विकास आराखडा तयार करणे आणि वस्तुस्थितीदर्शक अहवाल (Status Report) मा. न्यायालयास सादर करणेकरिता मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, यांच्या अध्यक्षतेखाली पुढील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :

| अ.क्र. | समितीवरील नियुक्त अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १. | मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव व विधी परामर्शी, विधि व न्याय विभाग | सदस्य |
| ३. | प्रधान सचिव / सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ४. | प्रधान सचिव/सचिव, नियोजन विभाग | सदस्य |
| ५. | प्रधान सचिव/सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ६. | मा.मुख्य न्यायमूर्ती, मुंबई उच्च न्यायालय यांचेतर्फे नामनिर्देशित प्रबंधक | सदस्य |
| ७. | सह सचिव, कार्यासन-१३, विधि व न्याय विभाग | सदस्य सचिव |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८०९१४५८५०६२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f733daf00a6028414c43d0cc10d82aca b3b732c4edd56e818f8a3b355588753, serialNumber=9ebeebf21dc54ceec51e6d5ffc84b b94ca6af89497279007d66e97dc13547037, cn=Amogh Shyamkant Kaloti
Date: 2018.08.09 15:01:19 +05'30'

**( अमोघ श्या.कलोती )**

विधि सल्लागार-नि-सह सचिव

**प्रति,**

१.राज्यपालांचे सचिव.

२.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.

३.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.

४.मा.सभापती विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

५.मा.अध्यक्ष विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

६.मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

७. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.

८.प्रबंधक (निरीक्षणे-२), उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई.

९.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.

१०.प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

१२. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४. विधी सल्लागार-नि-सह सचिव (का.-१३), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५.सह सचिव (सेवा) यांचे स्वीय सहाय्यक, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७. उप सचिव, वित्त विभाग / नियोजन विभाग / इमारती-सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

१९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.

२०. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२१. सरकारी वकील, उच्च न्यायालय, अपील शाखा, रिट सेल, मुबई-३२.

२२. अवर सचिव / कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने.

२३. निवड नस्ती / संग्रहार्थ-कार्यासन-१३.